ग्रामीण तीर्थक्षेत्रांच्या परिसर विकास
आराखडयांत समाविष्ट करण्याच्या बाबी

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः तिर्थवि-२०१६/प्र.क्र.५९/योजना-६
बांधकाम भवन, २५ मर्झबान मार्ग
फोर्ट, मुंबई-४०० ००१
तारीख: १८ एप्रिल, २०१७

**वाचा:-**

१) नियोजन विभाग शासन निर्णय क्रमांकः तीक्षेवि-२०१५/प्र.क.६/१४४४, दिनांक ४ जून २०१५.

२) मा.मुख्यमंत्री यांचे अध्यक्षतेखालील राज्यस्तरीय शिखर समितीच्या दिनांक १४ मार्च २०१७ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.

**शासन परिपत्रक:-**

नियोजन विभाग शासन निर्णय क्रमांक तीक्षेवि-२०१५/प्र.क्र.६/का-१४४४, दिनांक ४ जून २०१५ अन्वये ग्रामीण भागातील तीर्थक्षेत्रांचे परिसर विकास आराखडे ग्राम विकास विभागामार्फत राबविण्यात येत आहेत. मा.मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखाली दिनांक १४ मार्च २०१७ रोजी आयोजित करण्यात आलेल्या शिखर समितीच्या बैठकीत मा.मुख्यमंत्री महोदयांनी तीर्थक्षेत्रांचे आराखडे शासन मान्यतेसाठी सादर करतांना, तीर्थक्षेत्रांचा परिसराचे सुयोग्य व्यवस्थापन होण्याच्यादृष्टीने तीर्थक्षेत्रांच्या आराखडयामध्ये विविध बाबींचा समावेश करण्याबाबत निदेशीत केले आहे. त्यानुसार जिल्हयांचे जिल्हाधिकारी, मुख्य कार्यकारी अधिकारी यांना खालीलप्रमाणे सूचीत करण्यात येत आहे.

२. नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक तीक्षेवि-२०१५/प्र.क्र.६/का-१४४४, दिनांक ४ जून २०१५ अन्वये तीर्थक्षेत्रांचे आराखडे जिल्हास्तरीय समिती, राज्यस्तरीय उच्चाधिकार समिती व शिखर समितीच्या मान्यतेसाठी सादर करतांना खालील बाबींचा समावेश असावा :-

अ) तीर्थक्षेत्राच्या ठिकाणी कायदा व सुव्यवस्था राखण्यासाठी पोलीस चौकीची योग्य व्यवस्था असावी.

ब) भाविकांकरीता येण्या-जाण्याकरीता बस स्थानकाची योग्य व्यवस्था असावी.

क) तीर्थक्षेत्राच्या ठिकाणी निर्माण होणारा कचरा (ओला व सुका) व सांडपाण्याचे सुयोग्य व्यवस्थापनाकरीता तजवीज असावी.

ड) तीर्थक्षेत्राच्या ठिकाणी भाविकांकरीता स्वच्छतागृह असावे.

इ) पर्जन्य जल पुन:भरणची (Rain Water Harvesting) व्यवस्था असावी.

ई) तीर्थक्षेत्राचा परिसर स्वच्छ व हिरवा (Green zone) राहण्याच्या दृष्टीने नियोजन करावे.

उ) ज्या तीर्थक्षेत्राच्या परिसरात शासकीय किंवा ट्रस्टची जागा उपलब्ध असेल, त्या जागेमध्ये मोठया प्रमाणात झाडे लावण्याचे प्रयोजन असावे.

३. वरील बाबींची देखभाल दुरुस्तीकरीता तजवीज करावी व सदर व्यवस्था कायमस्वरुपी (Sustainable) कार्यरत राहतील याद्दष्टीने नियोजन करण्यात यावे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४१८१४०२२७७६२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Aseem Gupta

Digitally signed by Aseem Gupta
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=RDD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=42cb1d992ceadc1f5fea3c14e1cedf9b5ea392a9c81fdbde5629e68c9158678b, cn=Aseem Gupta
Date: 2017.04.18 14:35:17 +05'30'

(असीम गुप्ता)
सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई
२. मा.मंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.राज्यमंत्री (ग्रा.वि.).यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
६. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
७. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव (बांधकाम), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
९. सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, बांधकाम भवन, मंबई
१०. विभागीय आयुक्त, आयुक्त कार्यालय, सर्व विभाग.
११. जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, (सर्व जिल्हे)
१२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व जिल्हे)
१३. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, (सर्व)
१४. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, जिल्हा (सर्व)
१५. जिल्हा नियोजन अधिकारी, (सर्व जिल्हे)
१६. नियोजन विभाग (का.१४७४/१४४४) मंत्रालय, मुंबई-३२.
१७. वित्त विभाग (व्यय -१५, अर्थसंकल्प-१६/१७), मंत्रालय, मुंबई ३२.
१८. कक्ष अधिकारी, कार्यासन क्र.वित्त-७, वित्त-१, वित्त-८, ग्राम विकास व जलसंधारण विभाग
१९. निवड नस्ती, योजना-६, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, मुंबई